**मा. मुख्य न्यायमूर्ती, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे तांत्रिक मनुष्यबळ पुरविण्याकरीता रु. २,९०,२२०/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र. तांत्रिक-२०२१/प्र.क्र. ४०/का. ०७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २९ ऑक्टोंबर, २०२१.**

वाचा :- १) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. Com./Sec./१२/२०१९, दिनांक ०२.०२.२०१९ व ३१.०८.२०२१.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्रान्वये मा. मुख्य न्यायमूर्ती, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या कार्यालयातील तांत्रिक कामकाजाकरीता तांत्रिक मनुष्यबळ पुरविण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने सहमती दर्शविली आहे. यानुषंगाने तांत्रिक मनुष्यबळ पुरविण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. मुख्य न्यायमूर्ती, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या कार्यालयातील संगणकीकरणीय कामाकरीता दोन तांत्रिक विकसक( Software Developer/ Senior Software Developer ) तीन महिने कालावधीकरीता पुरविण्यासाठी रु. २,९०,२२०/- (अक्षरी रु. दोन लक्ष नव्वद हजार दोनशे वीस फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक जे-०१, २०१४- न्यायदान, (००) १०२- उच्च न्यायालय, (०३) अपील शाखा, (०३) (०१) प्रबंधक- अपील शाखा भारीत (२०१४ ००९२) - १० कंत्राटी सेवा" या उदिष्टाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर तांत्रिक मनुष्यबळ NICSI यांच्याकडील मंजूर नामिकेमधून (panel) नामे Broadcasting Engineering Consultants India Ltd. (BECIL) या माध्यमाद्वारे (agency) करण्यात यावी.

४. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ मधील २ व ३ या अटींच्या अनुषंगाने प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार, तसेच वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक९४१/२०२१/व्यय-५, दिनांक २२.१०.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२९१४३४४७१८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2021.10.29 14:35:31 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. संचालनालय, लेखा व कोषागारे , ठाकरसी हाऊस ३, मुंबई पोर्ट ट्रस्ट, २ रा मजला, शुरजी वल्लभदास मार्ग, बेलार्ड इस्टे, मुंबई.
११. सह सचिव, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती.